**मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती वन्यजीव विभागाचे प्रशासकीय नियंत्रणामध्ये सुसूत्रता आणणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वनविभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- डब्ल्यूएलपी-०८१९/ प्र.क्र.२४८/फ-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ जानेवारी, २०२०.

वाचा :- १) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र. एसीआर-१००७/८४१/प्र.क्र.१२५/फ-७, दिनांक २३ ऑगस्ट, २०१२.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७१८/ प्र.क्र.२६८/फ-१, दिनांक ०४ डिसेंबर, २०१८.
३) महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. एएफओ-२०१८/ प्र.क्र.०४/फ-७, दिनांक २८ डिसेंबर, २०१८.
४) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र. एसीआर-१०१७/प्र.क्र.११०/फ-७अ/ दिनांक ०२ एप्रिल, २०१९.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) यांचे पत्र क्र. कक्ष-९/गोक/प्र.क्र.०१/ भाग-३/ ३६२४/१८-१९/ नागपूर, दिनांक १२.०३.२०१९.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) यांचे पत्र क्र. कक्ष-९/गोक/प्र.क्र.०१/ भाग-३/ २११६/१९-२०/ नागपूर, दिनांक १७.१०.२०१९.

**प्रस्तावना :-**

मेळघाट व्याघ्र प्रकल्पाचे व्यवस्थापन अधिक प्रभावीपणे करण्याकरिता मेळघाट व्याघ्र प्रकल्पाचे बफर क्षेत्र अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांचे एकछत्री नियंत्रणाखाली संदर्भीय शासन निर्णय क्र. २ अन्वये आणण्यात आले आहे. संदर्भीय शासन निर्णय क्र. ३ अन्वये मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती हे पद तात्पुरते स्थगित ठेवून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती हे पद तात्पुरत्या स्वरुपात संवर्गात जोडण्यात आलेले आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर ही दोन्ही पदे समकक्ष झाल्यामुळे अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती या पदाचे प्रशासकीय नियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) यांचे अखत्यारित ठेवण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय पत्र क्र. ५ व ६ अन्वये शिफारस केली आहे. पांढरकवडा वन्यजीव विभाग हा अमरावती महसूल विभागामध्ये येत असल्यामुळे विभागीय वन अधिकारी (वन्यजीव), पांढरकवडा हे पद व त्यांचे अधिनस्त असलेल्या क्षेत्राचे प्रशासकीय नियंत्रण अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांचेकडे ठेवण्याबाबत

प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय पत्र क्र. ६ अन्वये शिफारस केली आहे. मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती वन्यजीव विभागाचे प्रशासकीय नियंत्रणामध्ये सुसूत्रता आणण्याकरिता पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय :-**

१. विभागीय वन अधिकारी (वन्यजीव), पांढरकवडा हे पद व त्यांचे अधिनस्त असलेल्या क्षेत्राचे प्रशासकीय नियंत्रण अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांचे अधिनस्त राहील.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती या पदाचे प्रशासकीय नियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्ष्क (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे अधिनस्त राहील. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक/मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती यांचे प्रतिवेदन अधिकारी, पुनर्विलोकन अधिकारी, स्वीकृती अधिकारी खालीलप्रमाणे राहतील :-

| भारतीस वन सेवा अधिकारी | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | स्वीकृती अधिकारी |
|---|---|---|---|
| अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक / मुख्य वनसंरक्षक व क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (वने) | मा.मंत्री (वने) |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३११५३१४१६४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने

SUJAY DEORAO DODAL

Digitally signed by SUJAY DEORAO DODAL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a6a471816b9dbfd727f2e5ec4825f4678c8393d846acd1c16b8936c8b3a519c6, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUJAY DEORAO DODAL
Date: 2020.01.31 15:10:53 +05'30'

**(सुजय दोडल)**
**सह सचिव (वने)**
**महसुल व वनविभाग**

**प्रतिलीपी :-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

७) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८) प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

९) प्रधान मुख्य वनसंरक्षक माहिती धोरण व तंत्रज्ञान, नागपूर

१०) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पुर्व नागपूर/पश्चिम मुंबई.

११) .अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक , मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.

१२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) /( प्रशासन व दुय्यम संवर्ग), नागपूर.

१३) विभागीय आयुक्त, अमरावती.

१४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), यवतमाळ / अमरावती.

१५) जिल्हाधिकारी, अमरावती / यवतमाळ

१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती / यवतमाळ

१७) विभागीय वन अधिकारी (वन्यजीव) पांढरकवडा.

१८) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई / नागपूर.

१९) वित्त विभाग (व्यय-१० कार्यासन), मंत्रालय, मुंबई - ३२.

२०) वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२१) फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती)

*****